**१३व्या वित्त आयोगांतर्गत पंचायत राज संस्थांच्या बळकटीकरणासाठी जनरल बेसिक ग्रँट,जनरल परफॉर्मन्स ग्रँट, स्पेशल एरिया बेसिक ग्रँट व स्पेशल एरिया परफॉर्मन्स ग्रँटच्या स्वरुपात प्रत्यक्षपणे प्राप्त होणा-या निधीच्या मर्यादेतच निधी खर्च करणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
शासन परिपत्रक, क्रमांक- तेविआ २०११/प्र.क्र.८२/वित्त-४
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
दिनांक- ०९ डिसेंबर,२०११.

प्रस्तावना :- केंद्रिय वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार राज्यातील पंचायत राज संस्थांना त्यांच्या बळकटीकरणासाठी अनुदान देण्यात येते. दिनांक १ एप्रिल,२०१० पासून १३ व्या वित्त आयोगास प्रारंभ झाला असून त्याचा कालखंड १ एप्रिल २०१० ते ३१ मार्च २०१५ असा आहे. तेराव्या वित्त आयोगांतर्गत राज्याला प्राप्त होणारा निधी जनरल बेसिक ग्रँट, जनरल परफॉर्मन्स ग्रँट, स्पेशल एरिया बेसिक ग्रँट व स्पेशल एरिया परफॉर्मन्स ग्रँट या ४ प्रकारच्या ग्रँट्सच्या स्वरुपात प्राप्त होणार आहे. १३ वित्त आयोगांतर्गत प्राप्त होणारा निधी हा केंद्र शासनाकडून १००% अनुदानाच्या स्वरुपात प्राप्त होतो. प्राप्त होणा-या निधीचे राज्यातील पंचायत राज संस्थांना होणारे वितरण हे विहित निकषानुसारच करण्यात येते. वित्त आयोगांतर्गत प्राप्त झालेल्या निधीतून हाती घ्यावयाच्या कामांचे नियोजन करुन त्यावर होणारा खर्च प्रत्यक्षपणे प्राप्त निधीच्या मर्यादेतच करणे बंधनकारक आहे. अशाप्रकारच्या सूचना यापूर्वी शासनाने वारंवार देवूनही काही जिल्हा परिदांनी प्राप्त निधीच्या मर्यादेपेक्षा अधिक रकमेचे नियोजन करुन अतिरिक्त दायित्व निर्माण केले आहे, असे शासनाच्या निदर्शनास आले आहे. वित्त आयोगांतर्गत उपलब्ध निधीपेक्षा अधिक रकमेचे दायित्व निर्माण करुन अनियमितता केल्याप्रकरणी विधीमंडळ सदस्यांनी सभागृहात वारंवार प्रश्न उपस्थित केले असून, त्याबाबत शासनाने उपाययोजना करण्याबाबतच्या सूचना केल्या आहेत. त्यानुसार सदरचे परिपत्रक जारी करण्यात येत आहे.

शासन परिपत्रक:-

१३ व्या वित्त आयोगांतर्गत प्राप्त होणारा जनरल बेसिक ग्रँट, जनरल परफॉर्मन्स ग्रँटचा निधी राज्यातील पंचायत राज संस्थांना जिल्हा परिषद, पंचायत समिती व ग्रामपंचायत स्तरासाठी १०:२०:७० या प्रमाणात व स्पेशल एरिया बेसिक ग्रँट व स्पेशल एरिया परफॉर्मन्स ग्रँटचा निधी १००% ग्रामपंचायत स्तरासाठी विहित निकषानुसार वितरीत करण्याबाबतचा धोरणात्मक निर्णय यापूर्वीच विभागाने घेतला असून वितरीत निधीतून हाती घ्यावयाच्या बाबी शासन निर्णय, तेविआ-२०१०/प्र.क्र.२२/वित्त-४, दिनांक ३०/८/२०१० नुसार प्रस्तावित केले आहेत. तसेच, सदर शासन निर्णयात पंचायत राज संस्थांनी प्राप्त निधीपेक्षा जास्त निधी खर्च करुन नये व जास्तीचे अधिक दायित्व निर्माण करुन नये अशा प्रकारच्या सूचना देण्यात आल्या आहेत. यापूर्वी सन २००५ ते २०१० या कालखंडासाठी असलेल्या १२ व्या वित्त आयोगासंदर्भातही अशाच प्रकारच्या सूचना सर्व पंचायत राज संस्थांना देण्यात आल्या होत्या.

२. तथापि,अशाप्रकारच्या सूचना शासनाने वारंवार देवूनही काही जिल्हा परिषदांनी प्राप्त निधीच्या मर्यादेपेक्षा अधिक रकमेचे नियोजन करुन अतिरिक्त दायित्व निर्माण केले आहे,असे शासनाच्या निदर्शनास आले आहे. त्या पार्श्वभूमीवर सर्व पंचायत राज संस्थांना पुढील सूचना देत आहे.

"पंचायत राज संस्थांनी १३ व्या वित्त आयोगांतर्गत उपलब्ध झालेल्या निधीपेक्षा जास्तीचा निधी खर्च करु नये. उपलब्ध निधीच्या मर्यादेपेक्षा अधिक रक्कम खर्च करणे, ही बाब गंभीर स्वरुपाची वित्तीय अनियमितता आहे. त्यामुळे पंचायत-राज संस्थांनी त्यांना १३ व्या वित्त आयोगांतर्गत उपलब्ध निधीपेक्षा अधिक रक्कम खर्च करुन अतिरिक्त दायित्व निर्माण केल्यास, अशा प्रकारचे दायित्व निर्माण होण्यास जबाबदार असणा-या अधिकारी/कर्मचा-यांची विभागीय चौकशी करण्यात येईल. तसेच,अतिरिक्त दायित्वाची रक्कम संबंधीत जबाबदार अधिकारी/कर्मचा-यांकडून वसूल करण्यात येईल".

सदरचे शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक-२०१११२०९०८५०१४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने ,

(एकनाथ मोरे)
उप सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रति,

मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव
मा.विधानसभा व विधान परिषद सदस्य (सर्व)
मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक.
मा.सचिव (ग्रा.वि. व पं.रा.) यांचे स्वीय सहाय्यक
महालेखापाल, महाराष्ट्र - १ (लेखापरीक्षा), मुंबई (पाच जादा प्रतीसह)
महालेखापाल, महाराष्ट्र - २ (लेखापरीक्षा), नागपूर (पाच जादा प्रतीसह)
सर्व विभागीय आयुक्त (महसूल)
सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष.
संचालक तथा मुख्य लेखा परिक्षक,स्थानिक निधी लेखा, कोकण भवन,नवी मुंबई.
सर्व उपसचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
सर्व सहमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा (सर्व विभाग)
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत)
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
वित्त विभाग (व्यय-१५/अर्थोपाय / वित्त आयोग कक्ष.)
ग्राम विकास व जलसंधारण विभाग ( सर्व कार्यासने )
निवड नस्ती का.वित्त-४, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२

---